भाजीपाला रोपमळे, फळेरोपमळे व स्थानिक उद्याने (अनिवार्य) (२४०१ १७२२) या लेखाशिर्षांतर्गत मागील वर्षातील प्रलंबित असलेल्या ०२ मजूरी, २१ पुरवठा व साधनसामुग्री याबाबीसाठी नागपूर जिल्हयातील फळरोपवाटिकांना एकूण रु. ८४.६२ लक्ष निधी वितरीत करणे.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: फरोवा-२०२०/प्र.क्र.७६/१३-अे,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक:- २२ जून, २०२०

संदर्भ:-१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-२/२४०११७२२/०२ मजूरी/ १०७/२०२०, दि.२७ मार्च २०२०.

२) मा. मंत्री पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास क्रीडा व युवक कल्याण, यांचे दि.२१/४/२०२० चे मा. मंत्री (कृषि) यांना दिलेले पत्र.

३) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,नागपूर यांचे पत्र क्र.ता.क-२/फमो/ २४०१-१७२२/अ.मा./२२११/२०, दि.२२/०४/२०२०.

**प्रस्तावना:-**

राज्यातील १४० तालुका फळरोपवाटिकाचे सुमारे ५.५९ लाख हेक्टर क्षेत्र आहे.दर वर्षी ५५-६० लाख कलमे/रोपांचे उत्पादन केले जाते. त्यापोटी शासनास १८ कोटी रूपयांचा महसूलप्राप्त होतो. फळरोपवाटिकेवरील कामे मजुरांकडून (ठेका पध्दतीने) करून घेण्यात येतात. काही काम करणारे मजूर न्यायालयात गेल्यामुळे न्यायालयाच्या आदेशानुसार त्यांना रक्कमा दयाव्या लागतात. तसेच बदलत्या हवामानामुळे शेती सदृश्य रोपवाटिकेवरील कामाना नैसगिक परिस्थितीला तोड दयावे लागते. यामुळे मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीच्या मर्यादेत खर्च करणे थांबविता येत नाही. यास्तव जादाचा खर्च करणे अपरिहार्य आहे.निधी अभावि कामे थाबविल्यास त्याचा परिणाम कलमे/रोपांच्या उत्पादनावर पर्यायाने राज्यातील फलोत्पादन क्षेत्रावर होवू शकतो.यासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील प्रलंबित असलेली देयके सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीतून १० टक्क्याच्या वरील मर्यादेत खर्च करण्यास मान्यता देण्याबाबतची विनंती कृषि आयुक्तालयाने केली होती.

नागपूर जिल्हयातील फळरोपवाटिकांना ०२ मजूरी व २१ पुरवठा व सामुग्री याबाबीसाठी भाजीपाला रोपमळे, फळरोपमळे व स्थानिक उद्याने (अनिवार्य) (२४०१ १७२२) या लेखाशिर्षांतर्गत रु.८४.६२ लक्ष निधीची केलेल्या मागणीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२०-२१ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीत ०२ मजूरी बाबीखालील व २१- पुरवठा व साधन सामुग्री याबाबीखाली मंजूर करण्यात आलेले आहेत. मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी नागपूर विभागातील शासकीय फळरोपवाटिकांना ०२ मजूरी बाबीसाठी ६१.९७ लक्ष व पुरवठा व साधनसामुग्री याबाबीसाठी रू. २२.६५ लक्ष अशा एकूण रु. ८४.६२ लक्ष निधी सन

२०१९-२० मधील प्रलंबीत असलेली देयके अदा करण्यासाठी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.९३/२०२०/व्यय-१ कार्यासनाच्या दि.१५.५.२०२० च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००६२३१०४५०१०५०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.06.23 10:52:33 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. विभागीय कृषी सहसंचालक,नागपूर विभाग,नागपूर.
४. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, नागपूर,
५. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई /नागपूर,
६. महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
७. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,नागपूर.
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. सहसंचालक लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई -३२,
१०.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.
११.निवड नस्ती (१३-अे)